**मासेमारी करताना अपघाती मृत्यू झाल्यास मच्छिमारांच्या कायदेशीर वारसांना द्यावयाचे <u>अर्थसहाय्य....</u>**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:- मत्स्यवि-२००९/प्र.क्र.१३४/पदुम-१४**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : २१ नोव्हेंबर, २००९**

**वाचा- १) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक मत्स्यवि-१००६/७९(१३)/पदुम-१४, दिनांक १ एप्रिल, २००८**
**२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक सीएलएस-२००९/प्र.क्र.२०४/म-३, दिनांक १९ नोव्हेबर, २००९**
**३) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक पुनर्वि-२००९/प्र.क्र.१२३/पदुम-१६, दिनांक २१ नोव्हेंबर, २००९**

**<u>शासन निर्णय:-</u>**

मच्छिमारांचा अपघाती मृत्यू झाल्यास अथवा बेपत्ता झाल्यास त्यांच्या कायदेशीर वारसांना रु.१,००,०००/- इतके अर्थसहाय्य मत्स्यव्यवसाय विभागामार्फत देण्यात येते. तसेच महसूल व वन विभागामार्फतसुध्दा नैसर्गिक आपत्तीमुळे मृत अथवा बेपत्ता झालेल्या व्यक्तीच्या वारसांना रु. १,००,०००/- इतके अर्थसहाय्य देण्यात येते. फयान चक्रीवादळामुळे बेपत्ता/मृत पावलेल्या मच्छिमारांना एक विशेष बाब म्हणून महसूल व वन विभाग व मत्स्यव्यवसाय विभाग या दोन्ही विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या योजनेचा फायदा देण्यात यावा, असा शासनाने निर्णय घेतलेला आहे.

२. मच्छिमारांचा अपघाती मृत्यू झाल्यास अथवा बेपत्ता झाल्यास त्यांच्या कायदेशीर वारसांना मत्स्यव्यवसाय विभागामार्फत देण्यात येणा-या रु. १,००,०००/- इतके अर्थसहाय्याबाबतचा खर्च हा खालील लेखाशिर्षाअंतर्गत उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा-

"मागणी क्र.डी. ६, २४०५- मत्स्यव्यवसाय, १०३ - सागरी मत्स्यव्यवसाय, (०१) (०४) नैसर्गिक आपत्तीत मृत पावलेल्या मच्छिमारांच्या वारसांना अनुदान, ३१ सहाय्यक अनुदाने (२४०५ १२८७) योजनेत्तर/दत्तमत"

३. नैसर्गिक आपत्तीखाली सीआरएफमधील निकषानुसार रु. १,००,०००/- इतकी देय असलेली रक्कम ही संबंधित जिल्हयाच्या जिल्हाधिका-यांनी आपल्या नैसर्गिक आपत्ती खाली मंजूर असलेल्या तरतूदीतून खर्च भागवावा.

४. महाराष्ट्र राज्याच्या बंदरात नोंदणी केलेल्या नौकांवरील खलाशी / कामगार बेपत्ता आहे किंवा मृत पावलेले आहेत ते जरी महाराष्ट्राचे रहिवासी (Domicile) नसले तरी त्यांचे कायदेशीर वारस उपरोक्त मदत मिळण्यास पात्र राहतील.

५. बेपत्ता व्यक्तींना द्यावयाच्या अनुदानाबाबत शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक सीएलएस-०७-०५/प्र.क्र.१९२/म-३, दिनांक १९ सप्टेंबर, २००५ रोजी निर्गमित केलेल्या आदेशातील परिच्छेद क्र. ४ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या व शर्तीच्या अधीन राहून सर्वसाधारणपणे मृत घोषित करण्यासाठी बेपत्ता असलेल्या व्यक्तींस आवश्यक असलेला ७ वर्षांचा कालावधी एक विशेष बाब म्हणून दोन महिन्याचा करण्यात येत आहे.

अशा प्रकरणी घटना घडल्याच्या तारखेपासून दोन महिन्यापर्यंत संबंधित व्यक्तीची वाट पाहण्यात यावी तसेच शोध घेण्यात यावा. सदर कालावधीत ती व्यक्ती परत न आल्यास किंवा तिचा शोध न लागल्यास बेपत्ता व्यक्तीच्या वारसांस स्थायी आदेशातील वयोमर्यादेच्या तरतूदीनुसार व अटींनुसार अर्थसहाय्य देण्यात यावे.

६. वरील परिच्छेद क्रमांक २ व ३ मध्ये नमूद केल्यानुसार देय मदतीबाबत आयुक्त मत्स्यव्यवसाय व संबंधित जिल्हयांच्या जिल्हाधिकारी यांनी समन्वय ठेऊन मृत / बेपत्ता व्यक्तीच्या वारसांस मदत देण्याबाबतआवश्यक ती कार्यवाही तात्काळ करावी.

सदरहू रक्कम कोषागारातून काढण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबंधित जिल्ह्याचे सहाय्यक मत्स्यव्यवसाय आयुक्त यांना घोषित करण्यात येत आहे व नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांना घोषित करण्यात येत आहे.

हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३६/०९/अर्थसंकल्प-१५, दिनांक २१.११.२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २००९११२१८३४४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**(ज.ल.पावरा)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-५१ (५ प्रती )**
**प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई**
**सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई / ठाणे / रायगड /रत्नागिरी / सिंधुदूर्ग**
**महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर**
**अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई**
**निवासी लेखा अधिकारी, मूंबई**
**लेखा अधिकारी, आयुक्त मत्स्यव्यवाय यांचे कार्यालय, मुंबई**
**जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे / रायगड (अलिबाग) / रत्नागिरी/सिंधुदूर्ग**
**उपकोषागार अधिकारी, पालघर (ठाणे)/ मालवण (सिंधुदूर्ग)**
**वित्त विभाग (व्यय-१/अर्थ-१५), मंत्रालय, मुंबई-३२**
**नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई**
**महसूल व वन विभाग (म-३) मंत्रालय, मुंबई**

**प्रत,**

**मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई-३२**
**मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२**
**मा. मंत्री (मत्स्यव्यवाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२**
**मा. राज्यमंत्री (मत्स्यव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२**
**सहसचिव, मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२**
**सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.**
**निवडनस्ती.**